मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेले वर्ग ३ चे

शासकीय कर्मचारी

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक विपुस - १०७८ - पंधरा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० जून १९८०.

## परिपत्रक

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७८- पंधरा, दिनांक २ ऑक्टोबर १९७८ अन्वये असे आदेश देण्यात आले होते की वर्ग ३ च्या ज्या शासकीय कर्मचाऱ्यांना दिनांक १७ ऑगस्ट १९७७ (मध्यान्होत्तर) पूर्वी त्यांच्या वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्या अगोदर मुदतपूर्व सेवा निवृत्त करण्यात आले होते, त्यांची प्रकरणे संबंधित विशेष पुनर्विलोकन समित्यांपुढे सुधारित निकषांच्या आधारे नव्याने पुनर्विलोकन करण्यासाठी ठेवण्यात यावीत, व अशा पुनर्विलोकनानंतर त्यांच्यापैकी जे सेवेत रहाण्यास पात्र ठरतील त्यांना सेवेत परत घेण्यात यावे. सदर परिपत्रकात अशीही तरतूद होती की या प्रकारे सेवेत परत घेतल्या गेलेल्या कर्मचाऱ्यांचा, मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून सेवेत परत दाखल झाल्याच्या दिनांकापर्यंतचा, अनुपस्थितीचा कालावधी असाधारण ( extraordinary ) रजा म्हणून गणला जावा.

२. हा असाधारण रजेचा कालावधी वेतनवाढीसाठी गणण्यात यावा किंवा कसे, हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने असा निर्णय घेतला आहे की शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७८- पंधरा दिनांक २ ऑक्टोबर, १९७८ च्या परिच्छेद २ (एच)मधील तरतुदीस अनुसरून असाधारण ( extraordinary ) रजा म्हणून विनियमित केलेला कालावधी वेतन वाढीसाठी गणण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहेत. संदर्भ वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-९७१/८०/एसईआर-३, दिनांक २१ जून, १९८०.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ग. ज. देशमाने,
विशेष कार्य अधिकारी.

कृ. मा. प.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,

मुख्य मंत्री यांचे सचिव,

महालेखापाल, महाराष्ट्र (१) मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र (२) नागपूर,

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

निवासी लेखापरीक्षाधिकारी, मुंबई,

*प्रबंधक, मूळ न्यायशाखा उच्च न्यायालय, मुंबई,

*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

इतर सर्व विभाग प्रमुख,

सर्व कार्यालय प्रमुख,

वित्त विभाग(१ प्रती),

मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,

*प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* पत्राने.

-----

एच- २५५(१५००-७-८०).